**राज्य शासकीय महिला कर्मचा-यांची प्रसूती रजेची मर्यादा १८० दिवसापर्यंत <u>वाढविण्याबाबत.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:अरजा-१४०९/प्र.क्र.८/०९/सेवा-६,**
**मंत्रालय , मुंबई -४०००३२**
**दिनांक :- २४ ऑगस्ट ,२००९.**

**वाचा-** १)शासननिर्णय , वित्तविभाग क्रमांक:अरजा-१४९०/१२/सेवा-९ , दिनांक २८/७/१९९५.
२) शासन शुध्दीपत्र , वित्त विभाग क्रमांक: अरजा-१४९०/१२/सेवा-९ , दिनांक ४/११/१९९६.

**<u>शासन निर्णय</u>**

महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ च्या नियम ७४ मध्ये विहित केलेल्या तसेच यामध्ये प्रस्तावनेतील शासन निर्णय, दिनांक २८ जुलै, १९९५ अन्वये सुधारित केलेल्या शर्तींच्या अधिन राहून राज्य शासनातील महिला कर्मचा-यांना ९० दिवसांची प्रसूती रजा मंजूर करण्यात येते. केंद्र शासनाने सहाव्या केंद्रीय वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार केंद्र शासनातील महिला कर्मचा-यांना प्रसूती रजेचा कालावधी १३५ दिवसांवरुन १८० दिवसांपर्यंत वाढविला आहे. याच धर्तीवर राज्य शासनातील महिला कर्मचा-यांना सध्या अनुज्ञेय असलेली ९० दिवसांची प्रसूती रजा १८० दिवसांपर्यंत वाढविण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. याबाबत आता शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

१) महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ च्या नियम ७४ मधील तरतुदीनुसार राज्य शासकीय महिला कर्मचा-यांना अनुज्ञेय असलेली ९० दिवसांची प्रसूती रजेची मर्यादा १८० दिवसांपर्यंत वाढविण्यात यावी. या सुविधेचा लाभ फक्त दोन अपत्यांपुरताच मर्यादित राहील. प्रसूती रजा मंजूर करण्याच्या इतर शर्ती पूर्वीप्रमाणे यापुढेही लागू राहतील.
२) या सुविधेचा लाभ आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून लागू राहील.
३) महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील यासंबंधातील विद्यमान तरतुदी या शासन निर्णयातील तरतुदीपुरते सुधारण्यात आले असे मानण्यात यावे. उपरोक्त नियमामध्ये रीतसर सुधारणा यथावकाश करण्यात येईल.
४) सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९०८२४१३०२२१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**नमिता नं.पाटील**
**शासनाच्या उप सचिव.**

प्रति,

महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.(८० प्रती)
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र,नागपूर. (८० प्रती)

रोटा/एच-१४४१[६०००+५०-८-२००९]-१ 

महालेखापाल-१(लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई. (४० प्रती)
महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर. (४० प्रती)
महालेखापाल (वाणिज्य लेखापरीक्षा), मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई. (४० प्रती)
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई. (५ प्रती)
राज्यपालांचे सचिव
मुख्यमंत्र्यांचे सचिव
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव व सचिव, मंत्रालय, मुंबई.
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
* सचिव , महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई.
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
मुख्य लेखापरीक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
सर्व मंत्रालयीन विभाग.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
मंत्रालयाच्या निरनिराळया विभागांच्या अधिपत्याखाली असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख.
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली.
वित्त विभागातील सर्व कार्यासने,(ग्रंथपाल ५ प्रती).
निवड नस्ती - कार्यासन सेवा-६, वित्त विभाग.

----------

* पत्राने

----------